**धर्मादाय सह आयुक्त, पुणे यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या चौकशी समितीने केलेल्या शिफारशींच्या अनुषंगाने कार्यवाही करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः समिती २५२५/ प्र.क्र.२८/का.१५,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: २१ एप्रिल, २०२५

**संदर्भ :-**

१) शासन निर्णय, विधि व न्याय विभाग क्र. समिती २५२५/ प्र.क्र.२८/का.१५ दि.०४.०४.२०२५

**प्रस्तावना -**

प्रसुतीदरम्यान महिलेला दिनानाथ मंगेशकर रुग्णालय, पुणे येथे दाखल करण्यास टाळाटाळ केल्याची बाब निदर्शनास आली आहे. सदर घटनेची चौकशी करण्यासाठी संदर्भाधीन शासन निर्णयान्वये चौकशी समिती गठीत करण्यात आली होती. सदर समितीने केलेल्या शिफारशींच्या अनुषंगाने आवश्यक कार्यवाही करण्याच्या सूचना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

धर्मादाय सह आयुक्त, पुणे यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या समितीने चौकशी करून अहवाल व निष्कर्ष शासनास सादर केले आहेत. सदर अहवालातील शिफारशींच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत:-

१) मा. उच्च न्यायालयाच्या आदेशानुसार मंजूर करण्यात आलेल्या निर्धन व दुर्बल घटकांतील रुग्णांसाठीच्या धर्मादाय रुग्णालय योजनेची प्रभावी अंमलबजावणी करण्याकरिता सर्व धर्मादाय रुग्णालयांना धर्मादाय आयुक्तांनी सूचना द्याव्यात.

२) निर्धन रुग्ण निधी (IPF) शिल्लक नसल्याच्या कारणामुळे रुग्ण उपचारापासून वंचित राहू नये यासाठी राज्यातील सर्व धर्मादाय रुग्णालयांनी आरोग्याशी संबंधित जसे की, महात्मा ज्योतीबा फुले जन आरोग्य योजना, आयुष्यमान भारत योजना, राष्ट्रीय बाल स्वास्थ कार्यक्रम इत्यादी व अन्य सर्व आरोग्याशी संबंधीत योजना लागू कराव्यात.

३) धर्मादाय रूग्णालयातील आरक्षित खाटा निर्धन व दुर्बल घटकांतील रूग्णांसाठी नियोजित उपचार/शस्त्रक्रिया याकरीता उपलब्ध करुन देण्यासाठी सर्व धर्मादाय रुग्णालयांनी ऑनलाईन प्रणालीद्वारे मंत्रालयातील "धर्मादाय रुग्णालय मदत कक्षाची" पूर्वमान्यता घ्यावी. त्याचप्रमाणे आपत्कालीन परिस्थीतीमध्ये या योजनेअंतर्गत धर्मादाय रुग्णालयांनी प्रथम संबंधीत रुग्ण तातडीने भरती करुन घेवून त्यावर उपचार करावेत व त्याबाबत ऑनलाईन प्रणालीवर नोंद घेवून पुढील ४८ तासात प्रस्ताव मान्यतेसाठी मंत्रालयातील धर्मादाय रुग्णालय मदत कक्षामध्ये ऑनलाईन प्रणालीमध्ये कार्योत्तर मंजूरीसाठी पाठवावा.

४) निर्धन रुग्ण निधी (IPF) खात्याबाबतची अद्ययावत माहिती धर्मादाय रुग्णालयांकडून घेवून ती धर्मादाय आयुक्त यांच्या संकेतस्थळावर नियमितपणे अद्ययावत करण्यात यावी.

५) धर्मादाय रुग्णालयाने कोणत्याही रुग्णाकडून अवाजवी पद्धतीने अनामत रक्कम स्विकारण्यावर निर्बंध टाकण्यात येत आहेत. यापुढे अनामत रकमेअभावी धर्मादाय रुग्णालयामध्ये कुठल्याही रुग्णास उपचार नाकारले जाणार नाहीत याची दक्षता घेण्यात यावी.

६) सर्व धर्मादाय रुग्णालयामध्ये कोणत्याही आपत्कालीन परिस्थितीमधील रुग्णांवर प्राथम्याने उपचार करण्यात यावेत. आपत्कालीन परिस्थितीमध्ये गर्भवती महिलांवरील उपचाराचाही समावेश करण्यात येत आहे.

७) धर्मादाय रुग्णालयातील निर्धन व दुर्बल घटकामधील रुग्णांवर उपचाराकरीता मा. उच्च न्यायालयाने निर्देशीत केलेल्या योजनेअंतर्गत मा. उच्च न्यायालय किंवा शासनाने वेळोवेळी निर्देशीत केलेल्या कागदपत्रांव्यतिरिक्त अन्य कागदपत्रांची मागणी करण्यावर पूर्णपणे निर्बंध घालण्यात येत आहेत.

८) अनेक धर्मादाय रुग्णांलयांनी रुग्णालयाच्या उत्पन्नाचा मोठा स्त्रोत फार्मसी, रोगनिदान चाचण्या (उदा. पॅथॉलॉजी, रेडिओलॉजी, मायक्रोबायोलॉजी इ.) या बाहयस्त्रोतांकडे हस्तांतरीत केलेला आहे. यामुळे रुग्णालयाचे एकूण महसूली उत्पन्न कमी होते व त्याचा प्रत्यक्ष परिणाम आयपीएफ निधीमध्ये जमा होणारी रक्कम कमी होण्यावर होतो. त्यामुळे अशा सुविधा जरी धर्मादाय रुग्णालयाने बाहयस्त्रोतांकडे हस्तांतरीत केलेल्या असल्या तरी अशा बाहयस्त्रोतांकडे हस्तांतरीत सुविधांचे जे एकूण महसूली उत्पन्न दरवर्षी तयार होते त्याच्या दोन टक्के रक्कम आयपीएफ निधीमध्ये वर्ग करण्यात यावेत.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२५०४२११८०११८९९१२ असा आहे. हा शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VILAS SHIVAJI KHANDBAHALE

Digitally signed by VILAS SHIVAJI KHANDBAHALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT,
2.5.4.20=17f78c202c2c5af679d01b6be0d00a6c3c4097df58c7aef51840198654fef2a2, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=A107E66E98674C97AEE36AEB40218E5733867BDF79135D94410C8672550E4AF9, cn=VILAS SHIVAJI KHANDBAHALE
Date: 2025.04.21 18:02:24 +05'30'

**( विलास खांडबहाले )**

**उप विधि सल्लागार नि उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राज्यपाल सचिवालय, राजभवन, मलबार हिल, मुंबई.

२) मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई.

३) मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई.

४) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

५) मा.उप मुख्यमंत्री (नगर विकास) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

६) मा.उप मुख्यमंत्री (वित्त) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

७) सर्व मा. मंत्री/मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

८) मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद, मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई.

९) मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा, मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई.

१०) सर्व मा. विधानमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई.

११) मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

१२) सर्व अ.मु.स. / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई.

१३) मा. धर्मादाय आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

१४) सर्व धर्मादाय सह आयुक्त / उप आयुक्त, (धर्मादाय आयुक्त कार्यालयामार्फत).

१५) सर्व सहायक धर्मादाय आयुक्त (धर्मादाय आयुक्त कार्यालयामार्फत).

१६) सर्व धर्मादाय रुग्णालये (धर्मादाय आयुक्त कार्यालयामार्फत).

१७) कक्ष अधिकारी, धर्मादाय रुग्णालय मदत कक्ष, मंत्रालय, मुंबई.

१८) महालेखापाल १, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता ) मुंबई.

१९) महालेखापाल २, (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता ) नागपूर.

२०) निवडनस्ती (का.१५).